**बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या आस्थापनेवर बाह्ययंत्रणेव्दारे (महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ) घेण्यात आलेल्या ३००० मनुष्यबळाच्या सेवाकरिता अदा करावयाच्या मानधनासाठी पुरवणी मागणीव्दारे मंजुर झालेला निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक मरासु-०५२३/प्र.क्र.१६०/विशा-४**
मंत्रालय मुख्य इमारत, दुसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांकः- २९ मार्च, २०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय क्रमांक:एमआयएस-४२१/प्र.क्र.१६०/विशा-४ दिनांक २४ जुलै,२०२३
२) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.OW.CP/D-९(१०)/admin/sankirn/१६६/२०२४/ दिनांक ०१/१०/२०२४ रोजीचे पत्र.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.जा.क्र.२२६५/पोआ/कक्ष-९(८)/२०२४ दि.१७/१२/२०२४
४) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.जा.क्र.२२६५/पोआ/कक्ष-९(१२)/२०२५ दि.१७/०३/२०२५
५) शासन निर्णय क्रमांक मरासु-०५२३/प्र.क्र.१६०/विशा-४ दिनांक २९ मार्च,२०२५

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळाकडून एकूण ३००० मनुष्यबळाच्या सेवा दिनांक २१/११/२०२४ पासून ११ महिन्यांकरीता घेण्याबाबत अथवा बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालया अंतर्गत पोलीस शिपाई यांची भरती प्रक्रीया यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीपर्यत अंतिम मुदतवाढीस शासन निर्णय दिनांक २८ मार्च,२०२५ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. याकरीता येणारा खर्च मागणी क्र.बी-१ (२०५५००९७),१०-कंत्राटी सेवा या लेखाशिर्षामधुन उपलब्ध असलेल्या तरतुदीमधुन करण्यासही मान्यता देण्यात आली आहे.

महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळाकडून सुरक्षारक्षकांची सेवा घेण्याकामी दरमाह रु.९,९३,४६,५६०/- (रुपये नऊ कोटी त्र्याण्णव लाख सेहेचाळीस हजार पाचशे साठ फक्त) इतका खर्च आवश्यक आहे. सन २०२४-२०२५ च्या पहिल्या (अर्थसंकल्पीय) अधिवेशनात बृहन्मुंबई पोलीस आयुक्तलयाच्या आस्थापनेवर घेण्यात आलेल्या ३००० मनुष्यबळाच्या मानधनासाठी होणाऱ्या खर्चाच्या अनुषंगाने मागणी क्र.बी-१ (२०५५००९७) -१० कंत्राटी सेवा या लेखाशिर्षामधे रू. ४१,७०,२४,२७२/- (अक्षरी- रु.एकेचाळीस कोटी सत्तर लाख चोविस हजार दोनशे बाहत्तर फक्त) इतक्या रक्कमेच्या मंजूर पुरवणी अनुदानामधून माहे नोव्हेंबर ते फेब्रुवारी,२०२५ या महिन्यांच्या मानधनाकरिता पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई कार्यालयास वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

बृहन्मुंबई पोलीस आयुक्तालयाच्या आस्थापनेवर ३००० मनुष्यबळाच्या सेवा बाह्ययंत्रणेकडून (महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ) घेण्यास मुदतवाढ देण्यास तसेच याकरीता येणारा खर्च मागणी क्र.बी-१ (२०५५००९७),१०-कंत्राटी सेवा या लेखाशिर्षामधुन उपलब्ध असलेल्या तरतुदीमधुन करण्यास शासन निर्णय दिनांक २९ मार्च,२०२५ अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

सन २०२४-२०२५ च्या पहिल्या (अर्थसंकल्पीय) अधिवेशनात बृहन्मुंबई पोलीस आयुक्तलयाच्या आस्थापनेवर घेण्यात आलेल्या ३००० मनुष्यबळाच्या मानधनासाठी होणाऱ्या खर्चाच्या अनुषंगाने मागणी क्र.बी-१ (२०५५००९७) -१० कंत्राटी सेवा या लेखाशिर्षामधे रू. ४१,७०,२४,२७२/- (अक्षरी- रु.एकेचाळीस कोटी सत्तर लाख चोविस हजार दोनशे बाहत्तर फक्त) इतक्या मंजूर निधी पैकी माहे नोव्हेंबर ते मार्च,२०२५ या महिन्यांच्या मानधनाकरिता रुपये २८,८९,१३,९८७ /-(अठ्ठावीस कोटी एकोणनव्वद लाख तेरा हजार नऊशेसत्याऐंशीं फक्त)/- इतका पुरवणी मागणीव्दारे मंजुर झालेला निधी पोलीस आयुक्त बृहन्मुंबई, कार्यालयास वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्र. बी-१ (२०५५००९७),१०-कंत्राटी सेवा या लेखाशिर्षातुन करण्यात यावा. याकरिता पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना नियंत्रण अधिकारी तसेच त्यांच्या अधिनस्त वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाकडील अनौ.संदर्भ क्र.२८४/२०२५/व्यय-७,दि.२९/०३/२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२५०३२९१९५४३२७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकिंत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAVIN SAHEBRAO DHIKALE

Digitally signed by PRAVIN SAHEBRAO DHIKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=6d1bb8a730bc70c2cbcd0b01bab78ae17bc671feb580bcbbcd692fb0650b8855, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C5958E733FEF41BD5DDD91B20A6E0AC739E081BB933D0189686449BE15147182, cn=PRAVIN SAHEBRAO DHIKALE
Date: 2025.03.29 19:55:40 +05'30'

**( प्रविण ढिकले )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग**

**प्रत:-**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई
३) पोलीस महासंचालक तथा व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ,मुंबई
४) जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई
५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
६) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर
७) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
८) वित्त विभाग कार्यासन (व्यय-७),वित्तिय सुधारणा ,(आपुक) मंत्रालय,मुंबई
९) गृह विभाग, कार्यासन,पोल-५ अ,पोल-५ ब, पोल-३, मंत्रालय,मुंबई
१०) निवडनस्ती विशा/४